मोबाईल अप्लिकेशन विकसित करण्याकरीता
निवड केलेल्या विकासकांची यादी आणी त्याची
मार्गदर्शक तत्वे

महाराष्ट्र शासन
**माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः GAD-मातंसं०६१/२/२०१४-O/O DIRECTORATE OF IT-DIT (MH)**
७ वा मजला, मंत्रालय
मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ०२ सप्टेंबर, २०१४

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र शासनाचे माहिती तंत्रज्ञान संचालनालय नाविन्य पुर्ण तंत्रज्ञानाचा वापर करून जास्तीत जास्त लोकांना सेवा पुरविण्यासाठी प्रयत्नशिल आहे. मोबाईल फोनचा वापर देशात मोठया प्रमाणात होत आहे. मोबाईल फोनच्या माध्यमातुन जास्तीत-जास्त लोकांना व व्यावसाईकांना सेवा पुरविणे शासनास शक्य होणार आहे. मंत्रालयातील विभागांना शासनाकडुन देण्यात येणाऱ्या सेवा मोबाईल फोनच्या माध्यमातुन देण्याकरीता सुयोग्य असे अप्लिकेशन विकसित करण्याकरीता संस्थांची निवड करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्या करीता शासनाकडुन मोबाईल अप्लिकेशन विकसित करणाऱ्या इच्छूक संस्थांकडून प्रस्ताव मागविण्यात आले होते.

## शासन निर्णय :-

मोबाईल अप्लिकेशन विकसित करण्याकरीता इच्छुक संस्थाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी आणि मूल्यमापन करून शासनाने या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट “अ” मधील संस्थांची दिनांक १८ ऑगस्ट,२०१४ ते दिनांक १७ ऑगस्ट,२०१६ या दोन वर्षाच्या कालावधीसाठी निवड केलेली आहे.

**२.** राज्य शासनाचा कोणताही विभाग आणि त्यांच्या नियंत्रणाखालील क्षेत्रिय कार्यालये, मंडळे, महामंडळे स्वायत्त संस्था यांना या शासन निर्णयान्वये निवड केलेल्या संस्थाकडून मोबाईल अप्लिकेशन विकसित करावे.

**३.** मोबाईल अप्लिकेशन विकसित करण्यासंबंधी मार्गदर्शक तत्वे, निवड झालेल्या संस्थांच्या कामाचा अवाका (Scope), आणि संस्थांना काम देण्याची कार्यपध्दती इत्यादी बाबी खालील प्रमाणे आहेत. :-

## ४. मार्गदर्शक तत्वे :-

१) या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टात नमुद केकेल्या संस्थाच बोली लावण्यास पात्र राहतील.

२) मोबाईल अप्लिकेशन विकसित करण्यासाठी इच्छुक असलेला कोणताही विभाग, कार्यालय, स्थानिक स्वराज्य संस्था यांनी त्यांच्या गरजेनुसार प्रस्तावांची संकल्पनाप्रारूप, सादरीकरण, नमुना (Prototype) इत्यादी माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडे सादर करावा.

३) विभागांशी सल्ला मसलत करून, माहिती तंत्रज्ञान संचालनालय मोबाईल अप्लिकेशनची मुलभुत संकल्पनेची टिप्पणी तयार करेल. ती माहिती तंत्रज्ञान संचालनलायाकडुन निवड करण्यात आलेल्या सर्व पात्र संस्थांना ई-मेल द्वारे वितरित करण्यात येईल, आणि बोली लावण्याकरीता संस्थांना दोन आठवडयाची मुदत देण्यात येईल. संस्थांनी पात्र ठरण्यासाठी त्यांच्याकडे किमान mGov दर्जाचे आणि मराठी स्थानिकीकरण (Marathi Locatisation) या मध्ये प्रशिक्षित आणि त्या संबंधीचे प्रमाणपत्र धारण करणारे किमान दोन विकसक असणे आवश्यक आहे.

४) बोली लावणाऱ्या संस्थांना वाणिज्यिक आणि तांत्रिक असे दोन सिलबंद लखोटे एका मोठया पाकिटात सादर करावे लागतील. त्यासाठी दोन आठवडयाची मुदत असेल.

५) संस्थांना माहिती तंत्रज्ञान संचालनालयाच्या प्रकल्प अंमलबजावणी समिती समोर तांत्रिक सादरीकरण करावे लागेल. त्यावेळी ज्या विभागासाठी अप्लिकेशन विकसित करावयाचे आहे. त्या विभागाचा प्रतिनिधी हजर राहिल. ॲप्लीकेशन विकसित करणाऱ्या संस्थेची निवड त्यांनी विकसित केलेल्या कल्पनेच्या गुणवत्तेच्या आधारे करण्यात येईल. या सादरीकरणामध्ये User Interfere wire frame डाटाबेस Request आणि Key solution highlights याचा समावेश असेल.

६) केवळ तांत्रिक मूल्यमापनात यशस्वी झालेल्या संस्थांचेच वाणिज्यिक लिफाफे उघडण्यात येतील. त्यामधे न्युनतम बोली असणाऱ्या संस्थेलाच मोबाईल ॲप्लिकेशन आणि त्यासाठी बॅक एन्ड सर्व्हिस देण्यासाठी निवडण्यात येईल आणि त्यांनाच कार्यादेश देण्यात येतील.

७) निवड करण्यात आलेल्या संस्थेला माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडुन कार्यादेश देण्यात येतील. आणि मोबाईल अप्लिकेशनचा विकास करण्यासाठी येणारा खर्च माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडुन भागविण्यात येईल.

८) अप्लिकेशन होस्ट करण्यासाठी आवश्यक त्या सुविधा State Data Center कडुन विनामुल्य पुरवण्यात येतील. त्यामुळे यासाठी होणाऱ्या खर्चाचा समावेश बोलीमध्ये करता येणार नाही.

९) विकसित केलेल्या ॲप्लिकेशनचा बौध्दिक मालमत्ता हक्क, महाराष्ट्र शासनाकडे राहिल. अप्लिकेशन वरती ते विकसित करणाऱ्या कंपनीचे कुठेही नाव दर्शविले जाणार नाही किंवा त्याचा उल्लेख करता येणार नाही

१०) मोबाईल अप्लिकेशन अप्लिकेशनचा सोर्स कोड आणि प्रकल्पाशी संबंधीत दस्तावेज प्रकल्पाचे सादरीकरण आणि प्रकल्पाची केस स्टडी, यामध्ये प्रवेश इत्यादी पुर्ण हक्क माहिती तंत्रज्ञान संचालनालय व संबंधीत विभागाकडे राहतील.

११) विकसित केलेल्या अप्लिकेशनमध्ये सर्व संबंधीत eGov आणि mGov मानकांची पुर्तता होणे आवश्यक आहे.

१२) निवड करण्यात आलेल्या संस्था फक्त सॉफ्टवेअर अप्लिकेशन उपलब्ध करून देतील. कोणत्याही परिस्थितीत ते कोणत्याही प्रकल्पाकरीता हार्डवेअरचा पुरवठा करणार नाहीत.

१३) निवडीसाठी प्राप्त झालेले विनंती प्रस्ताव माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडुन फक्त मोबाईल गव्हर्नन्सकरिता वापरता येतील त्या व्यतिरिक्त अन्य प्रयोजनासाठी वापरता येणार नाहीत. इच्छूकतेचा प्रस्ताव फक्त मोबाईल अप्लिकेशन विकसीत करून देण्यासाठीच आहे. तो बाजारात उपलब्ध असलेल्या तत्सम उत्पादनासाठी नाही.

## ५. अप्लिकेशन विकसित करणाऱ्या संस्थेला खालील प्रमाणे कामे करावी लागतील :-

१) सॉफ्टवेअरची संकल्पना तयार करणे, त्याचा आराखडा तयार करणे.

२) मोबाईल अप्लिकेशन विकासित करून कार्यरत करणे.

३) आवश्यकतेनुसार विकसित केलेल्या अप्लिकेशनमध्ये गरजेनुसार फेरबदल करणे किंवा ते अत्याधुनिक करणे.

४) अप्लिकेशनची देखभाल व दुरूस्ती करणे.

५) सहाय्यकरी वेबसाईट, बॅक एन्ड कडे आवश्यक असणारी माहिती व वेबसाईट WCAG, GIGW, W३C, लोकलायझेशन कम्प्लायन्स, Functionality & Load Testing इत्यादी प्रमाणे करणे.

६) अप्लिकेशन आणि बॅक एन्ड वेबसाईटचे सुरक्षा परिक्षण आवश्यक असेल तेथे करावे लागेल.

७) तांत्रिक दस्तावेज / कंन्टेन्ट राईट अप करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०२११४९४९२०११ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAJESH MADANLAL AGGARWAL

Digitally signed by RAJESH MADANLAL AGGARWAL
DN: CN = RAJESH MADANLAL AGGARWAL, C = IN, S = NEW DELHI, O = ALL INDIA SERVICES, OU = IAS
Date: 2014.09.02 15:47:27 +05'30'

( राजेश अगरवाल )

प्रधान सचिव, (मातं) , महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
४. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. मुख्य सचिव यांचे खाजगी सचिव,
६. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
७. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई,
८. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा) मुंबई,
९. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१०. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
११. सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई
१२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र, मुंबई)
१३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता महाराष्ट्र, नागपूर)
१४. महालेखापाल, (लेखा परीक्षा , महाराष्ट्र, मुंबई )
१५. महालेखापाल, लेखापरीक्षा महाराष्ट्र, नागपूर
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई व नागपूर
१७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

१८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१९. सर्व पोलीस आयुक्त,
२०. सर्व विभागीय आयुक्त,
२१. सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
२२. सर्व जिल्हाधिकारी,
२३. सर्व जिल्हा परिषद / नगरपालिकांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२४. सर्व नगरपरिषदांचे मुख्याधिकारी,
२५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र ज्ञान महामंडळ मर्यादित,
२६. पहिला मजला, व्यवसाय शिक्षण प्रशिक्षण इमारत,
२७. सर्व मंत्रालयीन विभाग,
२८. सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण, मुंबई
२९. मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
३०. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
३१. निवड नस्ती (२ प्रती)

# परिशिष्ट “अ”

माहिती तंत्रज्ञान विभागाशी संपर्क साधण्याकरिता ई मेल apps@maharashtra.gov.in. मोबाईल ॲप संदर्भात विभागाकडे मेल पाठवण्याकरिता विषयामध्ये Mobile Application Development असे लिहावे.

| अक्र | कंपनीचे नाव | नाव | E-Mail ID | फोन नंबर | शहर/पत्ता |
|---|---|---|---|---|---|
| १ | रेड पांडा | करण राय | karan@redpanda.co.in | ०९८३३२१९७७७ | मुंबई |
| २ | मोबॉंड सॉफ्टवेअर कंन्सलटन्सी सर्व्हिसेस | सचिन टेके | ssteke@mobond.com | ०९८३३१८८८९८ | नेरुळ, नवी मुंबई |
| ३ | सिल्व्हर टच टेक्नॉलॉजी लि. | मनिष दोषी | sarla.meghnani@silvertouch.com | ०९८२५६०६२५०<br>०७९-२६५६३१५८ | अहमदाबाद |
| ४ | इंटेलिग्राम टेक्नॉलॉजी लि. | नर्मदा सेहगल | namrata.s@intelegain.com | ०९८२००३७३७३<br>०२२-४१५१६१२९ | नवी मुंबई |
| ५ | संगणन आयटी सोल्युशन प्रा.लि. | प्रणव चौधरी | pranav.choudhary@sanganan.com | ०९६५००५०६१०<br>०१२०-४२५९५२० | नोईडा युपी |
| ६ | आयएमआय मोबाईल | गौतम श्रीनिवास | gautam.t@imimobile.com | ०९७६९७४२२३३<br>०४०-२३५५५९४५ | हैद्राबाद |
| ७ | इनफीक्स सर्व्हिस प्रा.लि. | सुहास दाभाडे | suhas.dabhade@infinxinc.com | ०९८२०००२३५२ | सीप्झ, सेझ अंधेरी पूर्व |
| ८ | सॉफ्ट सिस्टमस कन्सलटन्सी प्रा.लि. | डॉ. नितीन बी उकुंडे | info@softsystems.in;<br>nitin@softsystems.in | ०९७६५०००० ११<br>०७१२-६६००१०१ | कोतवाल नगर , नागपुर |
| ९ | फोकलॉइड टेक्नॉलॉजी प्रा.लि. | वेंकट रामकृष्णन | venkat@focaloid.com | ०९४९६०१६९७१<br>०८०६६८०७८७५ | केआर पुरम , बंगलोर |
| १० | लिप्स आणि बाउंडस | भुषण देरे | bhushandere@lnbindia.com | ०९४२२०१६७१८ | नाऱ्हे , पुणे |
| ११ | थॉटवर्क टेक्नॉलॉजी प्रा.लि. | विशालक्ष्मि सुब्रमन्यम | visalas@thoughtworks.com | ०९८८६२३४८३१ | कोरमंगला, बंगलोर |
| १२ | स्पेशल आयडीआज वेब सोल्युशन प्रा.लि. | विशाल अग्रवाल | info@spatialideas.com | ०२२-६५१११११२६ | अंधेरी कुर्ला रोड , मुंबई |
| १३ | सीटी डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन प्रा.लि. | डॉ. प्रफुल पार्लेवर | praful.parlewar-cdc@hotmail.com | ०२२-२४१३५०७८<br>०९१६७९६७६०६ | नायगाव, मुंबई |
| १४ | नेटवर्क पिपल सर्व्हिस टेक प्रा.लि. | दिव्येश शर्मा | divyesh.sharma@npstx.com | ०२०-६७३०१७००<br>०९९२०६३५४७७ | नाऱ्हे , पुणे |
| १५ | क्रिस्टल हायटेक आयटी सोल्युशन प्रा.लि. | क्षितीज घुले | kshitij@crystalhitech.com | ०२०-६५०००९५९<br>०९८२२९४३१९१ | शिवाजीनगर पुणे |
| १६ | सायबर लिंक टेक्नॉलॉजी लि. | विकाश समोटा | ashish@cyberlinks.in | ०१२४-४२७४९७७<br>०९८१०३५०४५८ | एम जी रोड, गुरगाव |
| १७ | महाऑनलाईन | प्रसाद कोलते | venkiteswaran.puthucode@mahaonline.gov.in | ०२२-६७०७७००० | सायन पूर्व |
| १८ | अभिनव आयटी सोल्युशन प्रा.लि.पुणे | प्रो एम.एस.भुतडा | ezeesoftindia@gmail.com | ०९४२२३२५०२० | कोथरूड , पुणे |
| १९ | बिझनेस वल्डवाईड | हरप्रीत सिंग | businessbd@gmail.com | ०९८९१३५०५४० | नवी दिल्ली |